**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय (खुद्द) आस्थापनेवरील अधिकारी/ कर्मचाऱ्यांची वयाच्या ५०-५५ वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी ३० वर्षाच्या सेवाकालावधीपुढे सेवेत राहण्याची पात्र-अपात्रता आजमाविण्याकरीता विभागीय पुनर्विलोकन समिती.**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः आस्था-२०१४/प्र.क्र.१९६/पापु-०१

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीखः २२ जुलै, २०१४

वाचा :-

१) **शासन परिपत्रक क्रमांकः** सामान्य प्रशासन विभाग, एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दि.१२/५/१९८६
२) **शासन परिपत्रक क्रमांकः** सामान्य प्रशासन विभाग, विपुस-१०९२/प्र.क्र.२०/९२/१५, दि.१८ ऑक्टोंबर,१९९३

### प्रस्तावना :-

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम १०(४) व ६५ च्या अनुषंगाने शासन सेवेतील गट-अ, गट-ब, गट-क व गट-ड च्या अधिकारी/कर्मचाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे वा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यावर सेवेत राहण्याची पात्र-अपात्रता विहित निकषानुसार आजमाविणे हे शासनाचे धोरण आहे.

शासनाच्या पुनर्विलोकन विषयक धोरणानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय (खुद्द) च्या आस्थापनेवरील पुनर्विलोकनास पात्र होणाऱ्या गट-अ, गट-ब, गट-क व गट-ड च्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यावर त्यांची सेवा पुढे चालू ठेवणाकरीता पात्र-अपात्रता आजमावून त्यांचे पुनर्विलोकन करुन शिफारस करण्यासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये पुनर्विलोकन समिती गठीत करण्याची बाब विचाराधीन होती.

### शासन परिपत्रक:-

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेवून, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय (खुद्द) च्या आस्थापनेवरील पुनर्विलोकनास पात्र होणाऱ्या गट-अ, गट-ब, गट-क व गट-ड च्या

अधिकारी/कर्मचाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यावर त्यांची सेवा पुढे चालू ठेवणाकरीता पात्र-अपात्रता आजमावून त्यांचे पुनर्विलोकन करुन शिफारस करण्यासाठी पुढीलप्रमाणे पुनर्विलोकन समिती गठीत करण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | पदनाम | समिती |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) | अध्यक्ष |
| २ | उप सचिव (आस्थापना, पापु-०१) | सदस्य |
| ३ | अवर सचिव (आस्थापना, पापु-०१) | सदस्य |
| ४ | कक्ष अधिकारी (आस्थापना, पापु-०१) | सदस्य सचिव |

वरील समितीचे कामकाज शासनाने पुनर्विलोकनाबाबत विहित केलेल्या निकषांनुसार करण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४०७२२१४०९४०५५२८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KUDALE SHANTARAM S

Digitally signed by KUDALE SHANTARAM S
DN: CN = KUDALE SHANTARAM S, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.07.22 16:54:20 +05'30'

**(शां.सि.कुदळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
३. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व सह सचिव/उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का-१५), मंत्रालय, मुंबई.
६. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
   यांना कळविण्यात येते की, त्यांनी सदरहू शासन परिपत्रक त्यांच्या अधिनस्थ कार्यरत मंत्रालयीन सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावे.
७. निवड नस्ती (कार्यासन पापु-०१), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.